**शासकीय / अशासकीय अनुदानित व विद्यापीठ संचलित अभियांत्रिकी / तंत्रशास्त्र व इतर व्यावसायिक पदवी अभ्यासक्रमाचे शिक्षण शुल्क , विकास शुल्क व इतर शुल्क लागू करण्याबाबत.**

---

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : टीईएम-२००३/(२४९/०३)/तांशि-१
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १० सप्टेंबर, २००३

संदर्भ : १) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र. टिईएम-३३/२०००/(१५/२०००)/तांशि-१, दि.२० एप्रिल,२०००

२) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र. टिईएम-३३९६/(७६५६)/तांशि-१, दि.१५ मे,२०००

**प्रस्तावना :-** टी. एम. ए. पै फौन्डेशन व इतर विरुध्द कर्नाटक राज्य व इतर याप्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या याचिका क्रमांक :३१७/१९९३ च्या संदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाच्या ११ न्यायाधिशांच्या खंडपीठापुढे सुनावणी होऊन दिनांक ३१ऑक्टोबर, २००२ व ५ न्यायाधिशांच्या खंडपीठापुढे सुनावणी होऊन दि.१४ ऑगस्ट,२००३ रोजी मा.सर्वोच्च न्यायालयाने निकाल दिला आहे. तसेच याच प्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिनांक २३ ऑगस्ट,२००३ व दि.२सप्टेंबर,२००३ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने राज्यातील शासकीय व अनुदानित अभियांत्रिकी / तांत्रिक व इतर व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या महाविद्यालयातील शिक्षण शुल्क व इतर शुल्क निर्धारीत करावयाचे होते.

वरील प्रमाणे न्यायालयीन निर्णयास अनुसरुन राज्यातील शासकीय व अनुदानित व्यावसायिक महाविद्यालयातील शिक्षण शुल्क पुनर्रचना करण्या संबंधीचा प्रस्ताव दिनांक २६ ऑगस्ट,२००३ रोजीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. विभागाच्या सदर प्रस्तावास मंत्रिमंडळाने मान्यता दिलेली असून सदरहू मान्यता लक्षात घेऊन सुधारीत शिक्षण शुल्क व इतर शुल्क लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** शासन आता या शासन निर्णयान्वये राज्यातील शासकीय व अनुदानित अभियांत्रिकी व इतर व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या पदवी अभ्यासक्रमासाठी सन २००३-२००४ या शैक्षणिक वर्षापासून खालीलप्रमाणे शिक्षण शुल्क , विकास शुल्क व इतर शुल्क लागू करण्यासाठी मंजूरी देत आहे.

| अभ्यासक्रम | | लागू करण्यात यावयाचे शुल्क | | |
|---|---|---|---|---|
| | | शिक्षण शुल्क | विकास शुल्क | इतर शुल्क |
| १) | अभियांत्रिकी पदवी | १५,००० | ५,००० | ४,००० (♦) |
| २) | इतर व्यावसायिक पदवी अभ्यासक्रम | | | |
| | १) फार्मसी | ८,००० | ६,००० | २,००० |
| | २) वास्तुशास्त्र | ८,००० | ६,००० | २,००० |
| | ३) एच.एम.सी.टी. | ८,००० | ६,००० | २,००० |

विकास शुल्क व इतर शुल्क हे संस्थेच्या विकासाकरीता संस्थेच्या स्विय प्रपंची लेख्यामध्ये ठेवून घेण्यात येईल. तर शिक्षण शुल्क हे शासकीय कोषागारात जमा केले जाईल.

(♦) इतर शुल्काची गणना पुढीलप्रमाणे राहील. :-

| | | |
|---|---|---|
| १) | जिमखाना फी (आयडेटीटी कार्ड, मॅगेझीन्स, मेडिकल, इत्यादी) | रु. ५००/- |
| २) | ट्रेनिंग ॲण्ड प्लेसमेंट फी | रु. ७५/- |
| ३) | लायब्ररी फी | रु. ७००/- |
| ४) | लायब्ररी ॲण्ड लॅबोरेटरी कौशन मनी डिपॉझिट (परतावा योग्य. एकदाच अदा करण्यात येईल, प्रतिवर्षी नाही.) | रु. ५००/- |
| ५) | इंटरनेट ॲण्ड ई-मेल फॅसिलीटीझ फी | रु. ५००/- |
| ६) | ॲन्युअल सोशल गॅदरींग ॲण्ड अदर कल्चरल ॲक्टिव्हीटी फी | रु. १२५/- |
| ७) | लॅबोरेटरीज फी | रु.१६००/- |
| | एकूण | रु.४०००/- |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( श्या.र.चौरे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालय, मुंबई, पुणे, नागपूर, नाशिक, औरंगाबाद, अमरावती
सर्व शासकीय व अनुदानित अभियांत्रिकी / औषधनिर्माणशास्त्र / वास्तूशास्त्र व हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड कॅटरींग टेक्नॉलॉजी महाविद्यालये (संचालकांमार्फत )
सर्व अकृषि विद्यापीठे
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ , मुंबई / नागपूर
वित्त विभाग
निवासी लेखाधिकारी, मुंबई
निवड नस्ती तांशि-१

**शासकीय / अशासकीय अनुदानित व विद्यापीठ संचलित अभियांत्रिकी / तंत्रशास्त्र पदवी अभ्यासक्रमाचे शिक्षण शुल्क , विकास शुल्क व इतर शुल्क लागू करण्याबाबत.**

**----------------------------------**

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग,

शासन निर्णय, क्रमांक : टीईएम-२००३/(२४९/०३)/तांशि-१

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२

दिनांक : ११ सप्टेंबर, २००३

संदर्भ : १) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र. टिईएम-३३/२०००/(१५/२०००)/तांशि-१, दि.२० एप्रिल,२०००

२) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र. टिईएम-३३९६/(७६५६)/तांशि-१, दि.१५ मे,२०००

**<u>प्रस्तावना :-</u>** टी. एम. ए. पै फौन्डेशन व इतर विरुध्द कर्नाटक राज्य व इतर याप्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या याचिका क्रमांक :३१७/१९९३ च्या संदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाच्या ११ न्यायाधिशांच्या खंडपीठापुढे सुनावणी होऊन दिनांक ३१ऑक्टोबर, २००२ व ५ न्यायाधिशांच्या खंडपीठापुढे सुनावणी होऊन दि.१४ ऑगस्ट,२००३ रोजी मा.सर्वोच्च न्यायालयाने निकाल दिला आहे. तसेच याच प्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिनांक २३ ऑगस्ट,२००३ व दि.२सप्टेंबर,२००३ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने राज्यातील शासकीय व अनुदानित अभियांत्रिकी / तांत्रिक पदवी अभ्यासक्रमांच्या महाविद्यालयातील शिक्षण शुल्क , विकास शुल्क व इतर शुल्क निर्धारीत करावयाचे होते.

वरील प्रमाणे न्यायालयीन निर्णयास अनुसरुन राज्यातील शासकीय व अनुदानित व्यावसायिक महाविद्यालयातील शिक्षण शुल्क पुनर्रचना करण्या संबंधीचा विभागाचा प्रस्ताव दिनांक २६ ऑगस्ट,२००३ रोजीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. विभागाच्या सदर प्रस्तावास मंत्रिमंडळाने मान्यता दिलेली असून सदरहू मान्यता लक्षात घेऊन सुधारीत शिक्षण शुल्क , विकास शुल्क व इतर शुल्क लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** शासन आता या शासन निर्णयान्वये राज्यातील शासकीय व अनुदानित अभियांत्रिकी पदवी अभ्यासक्रमासाठी सन २००३-२००४ या शैक्षणिक वर्षापासून खालीलप्रमाणे शिक्षण शुल्क , विकास शुल्क व इतर शुल्क लागू करण्यासाठी मंजूरी देत आहे.

| अभ्यासक्रम | | लागू करण्यात यावयाचे शुल्क | | |
|---|---|---|---|---|
| | | शिक्षण शुल्क | विकास शुल्क | इतर शुल्क |
| १) | अभियांत्रिकी पदवी | १५,००० | ५,००० | ४,००० (♦) |

विकास शुल्क व इतर शुल्क हे संस्थेच्या विकासाकरीता संस्थेच्या स्विय प्रपंची लेख्यामध्ये ठेवून घेण्यात येईल. तर शिक्षण शुल्क हे शासकीय कोषागारात जमा केले जाईल.

(♦) इतर शुल्काची गणना पुढीलप्रमाणे राहील. :-

| | | |
|---|---|---|
| १) | जिमखाना फी (आयडेटीटी कार्ड, मॅगेझीन्स, मेडिकल, इत्यादी) | रु. ५००/- |
| २) | ट्रेनिंग ॲण्ड प्लेसमेंट फी | रु. ७५/- |
| ३) | लायब्ररी फी | रु. ७००/- |
| ४) | लायब्ररी ॲण्ड लॅबोरेटरी कौशन मनी डिपॉझिट (परतावा योग्य. एकदाच अदा करण्यात येईल, प्रतिवर्षी नाही.) | रु. ५००/- |
| ५) | इंटरनेट ॲण्ड ई-मेल फॅसिलीटीझ फी | रु. ५००/- |
| ६) | ॲन्युअल सोशल गॅदरींग ॲण्ड अदर कल्चरल ॲक्टिव्हीटी फी | रु. १२५/- |
| ७) | लॅबोरेटरीज फी | रु.१६००/- |
| | एकूण | रु.४०००/- |

वरीलप्रमाणे मान्य शुल्के ज्या प्रयोजनासाठी आकारण्यात आली आहेत त्याच प्रयोजनासाठी वापरण्यात यावीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( श्या.र.चौरे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालय, मुंबई, पुणे, नागपूर, नाशिक, औरंगाबाद, अमरावती
सर्व शासकीय व अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये (संचालकांमार्फत )
सर्व अकृषि विद्यापीठे
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ , मुंबई / नागपूर
वित्त विभाग
निवासी लेखाधिकारी, मुंबई
निवड नस्ती तांशि-१